पर्यटन विषयक “विशाल प्रकल्प” (मेगा प्रकल्प) घोषित करण्याबाबत.

मे. गिरीराज एन्टरप्राईजेस, संगमनेर, जि. अहमदनगर यांचा मुंढावरे ता, मावळ, जि. पुणे येथील प्रकल्प.

महाराष्ट्र शासन

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**

शासन निर्णय, क्रमांक टीडीसी २०१३/९/प्र.क्र.६४७/ पर्यटन,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ३ ऑगस्ट, २०१५.

संदर्भ : १) शासन निर्णय क्रमांक एमटीसी २००५/२/प्र.क्र.१७२/ पर्यटन, दि. १६/१२/२००६.
२) शासन निर्णय क्रमांक टिडीसी २००९/१/प्र.क्र.३०/पर्यटन, दि. २५/८/२००९.
३)सहव्यवस्थापकीयसंचालक,म.प.वि.म.मुंबईयांचेपत्रक्र.म.प.वि.म/प्रोत्साहन/प.धो.२००६/ मेगा प्रकल्प बैठक/२०१४/४५६२, दि.४/८/२०१४

प्रस्तावना :

शासन निर्णय क्र. एमटीसी २००५/२/प्र.क्र.१७२/ पर्यटन, दि. १६/१२/२००६ अन्वये पर्यटन धोरण-२००६ घोषित केले आहे. सदर शासन निर्णयातील पात्र घटकांना मेगा प्रकल्प घोषित करण्यासाठी धोरणातील अनुक्रमांक १० (ग) नुसार खालील प्रमाणे निकष निश्चित केले आहेत.

| अ.क्र. | क्षेत्र (प्रस्तावित पर्यटन धोरणानुसार) | गुंतवणूक (रु.कोटीत) | रोजगार निर्मिती |
|---|---|---|---|
| १ | अ | १०० | ५०० |
| २ | ब | ५० | ३०० |
| ३ | क | २५ | १० |

अ) मेगा प्रकल्पासाठी पर्यटन प्रकल्प एकतर गुंतवणूकीच्या दृष्टीने किंवा रोजगार निर्मितीच्या दृष्टीने पात्र असला पाहिजे.

ब) पर्यटन उद्योगामध्ये अप्रत्यक्ष रोजगार निर्मिती खूप जास्त आहे. वर दर्शविलेल्या रोजगार निर्मितीपैकी २५% पेक्षा जास्त अधिक नसलेला रोजगार, अप्रत्यक्ष रोजगार म्हणून समजण्यात येईल.

क) पर्यटन क्षेत्र हे रोजगार निर्मितीला चालना देणारे एक क्षेत्र आहे. ३ ते ५ तारांकित हॉटेलची एक खोली ९ व्यक्तीच्या प्रत्यक्ष रोजगारांची व १८ व्यक्तींच्या अप्रत्यक्ष रोजगारांची निर्मिती करते या व्यतिरीक्त अकुशल व अर्धकुशल व्यक्ती देखील पर्यटन क्षेत्रामध्ये सामावून घेतल्या जाऊ शकतात.

२. मे. गिरीराज एन्टरप्राईजेस यांनी त्याच्या मुंढावरे ता.मावळ, जि. पुणे येथील प्रकल्पास पर्यटन विषयक प्रकल्प (मेगा प्रोजेक्ट) विशाल प्रकल्प घोषित करण्याची मागणी केली होती. तद्नुसार उपरोक्त प्रकल्पास पर्यटन विषयक विशाल प्रकल्प (मेगा प्रोजेक्ट) घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होते.

३. मेगा प्रकल्प घोषित करण्यासाठी शासन निर्णय क्रमांक टिडीसी २००९/१/प्र.क्र.३०/पर्यटन,दि. २५/८/२००९ अन्वये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत केली असून समिती वरील निकषांप्रमाणे प्रस्तावांची छाननी करते.

**शासन निर्णय :**

मे. गिरीराज एन्टरप्राईजेस, संगमनेर , जि. अहमदनगर यांनी शासनास खालील प्रमाणे प्रस्ताव सादर केला होता.

| अ.क्र. | उपलब्ध जागा | प्रकल्प | भाग-भांडवल (रु. कोटीत) | रोजगार निर्मिती |
|---|---|---|---|---|
| १ | ५२.९० एकर | मनोरंजन उद्यान | २००.०० | अंदाजित ७००.०० |
| २ | | जलक्रिडा | १२५.०० | |
| ३ | | विश्रामगृह | ५०.०० | |
| ४ | | **एकूण** | **३७५.००** | |

४. वरील प्रकल्पास मेगा प्रकल्प म्हणून घोषित करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या सचिव समितीची दि. ८/७/२०१४ रोजी बैठक झाली. हा प्रकल्प, पर्यटन धोरण २००६ अन्वये केलेल्या क्षेत्रांच्या वर्गवारीपैकी परिमंडल “क” मध्ये येतो, शासनाच्या पर्यटन धोरण २००६ मधील मेगा (विशाल) प्रकल्पाबाबतच्या तरतुदीनुसार “क” क्षेत्रातील (परिमंडळातील) मेगा प्रकल्पासाठी किमान गुंतवणूक रु. २५.०० कोटी किंवा किमान १० रोजगार निर्मिती असली पाहिजे. प्रस्तुत प्रकरणी वरील दोन्ही निकषांची पूर्तता होत असल्याने सर्वकष विचार करुन या प्रकल्पास “ पर्यटन विशाल प्रकल्प (मेगा प्रोजेक्ट)” म्हणून मान्यता देण्याचा समितीने निर्णय घेतला. त्यानुसार बैठकीचे इतिवृत्त दि. ४/८/२०१४ रोजी निर्गमित केले आहे.

५. तरी दिनांक ८/७/२०१४ रोजी सचिव समितीने घेतलेल्या निर्णयानुसार मे. गिरीराज एन्टरप्राईजेस, संगमनेर, जि. अहमदनगर यांच्या मुंढावरे ता. मावळ, जि. पुणे येथील प्रकल्पास पर्यटन विषयक विशाल प्रकल्प (मेगा प्रोजेक्ट) म्हणून शासन मान्यता देत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०३१५४९३११६२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra
Laxmikant
Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=421202, st=Maharashtra, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2015.08.03 15:54:02 +05'30'

**(र.ल.लखोटे)**
**कार्यासन अधिकारी,**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
५) मे. गिरीराज एन्टरप्राईजेस, मालपाणी हाउस, आय. जी. रोड, संगमनेर -४२२६०५, जि. अहमदनगर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई.
१०)निवड नस्ती.

*****